**डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला अंतर्गत संत्र्याच्या कलम व प्रजाती संशोधन व उपलब्धता स्थापन करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पंदेवि-१३१८/प्र.क्र.०४/७-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०५ जानेवारी, २०१९.

संदर्भ :- १) संशोधन संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांचे पत्र जा.क्र.संसं/टिसी/१८६०/२०१८, दिनांक २५/०१/२०१८,
२) कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांचे पत्र जा.क्र.बीईटी/आस्था/संत्रा प्रस्ताव/२०१८, दिनांक १५/११/२०१८,
३) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे पत्र जा.क्र.मकृप/आस्थ-५/कृपबैइतिवृत्त-९७/२५५३/२०१८ दिनांक २७ नोव्हेंबर, २०१८,
४) संचालक (संशोधन), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे पत्र जा.क्र.मकृप /शिक्षण-१/२७९७/२०१८, दिनांक २० डिसेंबर, २०१८,
५) शासन परिपत्रक, नियोजन विभाग क्रमांक -ससमा २०१०/प्र.क्र.४८ (भाग-१)/का-१४६१, दिनांक ११ जून, २१०१८,

**प्रस्तावना :-**

नागपूर येथे दिनांक १६ डिसेंबर, २०१७ रोजी आयोजित केलेल्या जागतिक संत्रा प्रदर्शनामध्ये मा.मुख्यमंत्री महोदयांनी केलेल्या घोषणेस अनुसरुन संत्र्याच्या कलम प्रजाती संशोधन व उपलब्धता याकरिता डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत ३ प्रकल्प स्थापन करण्यासाठी संचालक (संशोधन), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये अंदाजपत्रक सादर केले आहे. त्यास अनुसरुन बांधण्यात येणा-या बांधकामाच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनस्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत संत्र्याच्या कलम प्रजाती संशोधन व उपलब्धता याकरिता पुढील प्रकल्पाच्या एकूण रु. २००.०० लक्ष एवढया किंमतीच्या सोबत जोडलेल्या परिशिष्ट “अ” येथील अंदाजपत्रकांना, खाली नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशिल / विवरण | आवर्ती | अनावर्ती | एकूण |
|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. |
| १ | उद्यानविद्या विभाग, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला | १३.९५ | ५६.०५ | ७०.०० |
| २ | प्रादेशिक फळ संशोधन केंद्र, काटोल | १३.९५ | ५६.०५ | ७०.०० |
| ३ | उद्यानविद्या शाखा, कृषि महाविद्यालय, नागपूर | ९.०५ | ५०.९५ | ६०.०० |
| | **एकूण - १+२+३** | **३२.४०** | **१६७.६०** | **२००.००** |

अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी करुनच काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इनव्ही- २०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च विद्यापीठाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात यावा.

इ) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दिनांक ०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यांत यावी.

ई) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

२. या बाबीकरीता येणारा खर्च डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला " मागणी क्रमांक डी-३, २४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१, पीक संवर्धन, १२०, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (०८) डॉ.पंजाबराव देश्‍मुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान,३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान (२४१५ ००९९) (कार्यक्रमांतर्गत)” या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. या प्रकरणी महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३, परिनियम १९९० आणि लेखासंहीता १९९१ मधील तरतूदींचा तसेच प्रचलित शासन आदेश / कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग - पाच अन्वये महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार या शिर्षाखाली अ. क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ समोरील तरतूदीन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार त्या समोरील विहित

अटीच्या अधिन राहून तसेच नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : ससमा-२०१० / प्र.क्र.४८ (भाग-१) / का.१४६१, दिनांक ११ जून, २०१८ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९०१०५१५३८५७३९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gite Pratap Venkatrao

Digitally signed by Gite Pratap Venkatrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and Animal Husbandry, Dairying and Fisheries Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa90705dc27d17e7f5a948e535706ff2c3a1f6c3212fbe679cdac2da9677bb72, serialNumber=707437d6d784d92730d943579bec96a06c8b9d1b0f545fe42541583be9e598cd, cn=Gite Pratap Venkatrao
Date: 2019.01.05 15:47:08 +05'30'

**( प्रताप व्यं.गिते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२) कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
३) कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
४) नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
५) वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
६) संचालक (संशोधन), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
७) संशोधन संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
८) विद्यापीठ अभियंता, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
९) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, जि.अकोला /उपकोषागार अधिकारी,अकोला, जि.अकोला,
११) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१२) उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१३) जिल्हा लेखा परिक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, डॉ.पं.दे.कृषि विद्यापीठ, अकोला,
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१५) कार्यासन (१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
१६) कार्यासन (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७) कक्ष अधिकारी २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१८) कार्यासन ७अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ (निवडनस्ती).

**शासन निर्णय क्रमांक : पंदेवि-१३१८/प्र.क्र.०४/७-अे, दिनांक ०५ जानेवारी, २०१९ चे सहपत्र परिशिष्ट"अ"**

**१. उद्यानविद्या विभाग डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.**

| अ.क्र. | तपशिल / विवरण | अंदाजे रुपये लाखामध्ये |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| अ | **आवर्तीत रक्कम**<br>मातृवृक्ष बागेसाठी खते, सिमेंटचा ओटा उभारणे गाळाची माती, शेणखत पॉलीथीन पिशव्या इंधन खर्च कीटक नाशके / बुरशी नाशके, शास्त्रज्ञांच्या भेटी, पाहुणे शास्त्रज्ञांच्या रोप वाटीकेला भेट इत्यादी, सिमेंट ओटा २० X ३० मिटर. | १३.९५ |
| | **एकूण (अ)** | **१३.९५** |
| ब | **बांधकाम खर्च**<br>१. रोपवाटिका मध्ये नेट हाऊस / हरित गृह / पॉलीहाउस उभारणी करणे. पॉलीहाऊस **१००० स्के.मीटर** @ (रुपये १४६५ प्रती चौरस मीटर) | १४.६५ |
| | २. पॉलीहाउस / कीड व प्रतिबंधक नेट हाउस रोपांची अंतिम विक्री करण्यासाठी (३००० चौरस मीटर दर ७१० रु. प्रती चौरस मीटर) | २१.३० |
| | ३. सौर उर्जा संस्कारण करण्यकरिता सिमेंटचा ओटा उभारणे. २० X ३० मिटर. | ३.०० |
| | ४. ठिबक सिंचन संच व पाईप लाइन **२ हेक्टर** | ३.०० |
| | ५. प्लॉस्टिक कॅरेट्स ८०० नग | ३.०० |
| | **एकूण (ब)** | **४४.९५** |
| क | **यंत्र व अवजारे**<br>i) ट्रॅ-ॅॅक्टर जोड अवजारासहित | ८.८० |
| | ii) रोप वाटीकेला जागणारे दैनंदिन अवजारे | १.०० |
| | iii) रोप वाटीकेला HTP फवारणी पंप व इतर साहित्य | ०.८० |
| | iv) ब्रशकटर रोप वाटिकेतील तण नियंत्रणासाठी | ०.५० |
| | **एकूण (क)** | **११.१०** |
| | **एकूण - अ+ब+क = (अक्षरी रुपये सत्तर लाख फक्त)** | **७०.००** |

## २. प्रादेशिक फळ संशोधन केंद्र, काटोल.

| अ.क्र. | तपशिल / विवरण | अंदाजे रुपये लाखामध्ये |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| अ | **आवर्तीत रक्कम**<br>मार्तृवृक्ष बागेसाठी खते, सिमेंटचा ओटा उभारणे गाळाची माती, शेणखत पॉलीथीन पिशव्या इंधन खर्च कीटक नाशके / बुरशी नाशके, शास्त्रज्ञांच्या भेटी, पाहुणे शास्त्रज्ञांच्या रोप वाटीकेला भेट इत्यादी. सिमेंट ओटा २० X ३० मीटर | १३.९५ |
| | **एकूण (अ)** | **१३.९५** |
| ब | **बांधकाम खर्च**<br>१. रोपवाटिका मध्ये नेट हाऊस / हरित गृह / पॉलीहाउस उभारणी करणे. पॉलीहाऊस **१००० स्के.मीटर** @ (रुपये १४६५ प्रती चौरस मीटर) | १४.६५ |
| | २. पॉलीहाउस / कीड व प्रतिबंधक नेट हाउस रोपांची अंतिम विक्री करण्यासाठी (३ ००० चौरस मीटर दर ७१० रु. प्रती चौरस मीटर) | २१.३० |
| | ३. सौर उर्जा संस्कारण करण्यकरिता सिमेंटचा ओटा उभारणे. २० X ३० मीटर | ३.०० |
| | ४. ठिबक सिंचन संच व पाईप लाइन **२ हेक्टर** | ३.०० |
| | ५. प्लॉस्टिक कॅरेट्स ८०० **नग** | ३.०० |
| | **एकूण (ब)** | **४४.९५** |
| क | **यंत्र व अवजारे**<br>i) ट्रॅक्टर जोड अवजारासहित | ८.८० |
| | ii) रोप वाटीकेला जागणारे दैनंदिन अवजारे | १.०० |
| | iii) रोप वाटीकेला HTP फवारणी पंप व इतर साहित्य | ०.८० |
| | iv) ब्रशकटर रोप वाटिकेतील तण नियंत्रणासाठी | ०.५० |
| | **एकूण (क)** | **११.१०** |
| | **एकूण - अ+ब+क = (अक्षरी रुपये सत्तर लाख फक्त)** | **७०.००** |

## ३.उद्यानविद्या शाखा, कृषि महाविद्यालय, नागपूर.

| अ.क्र. | तपशिल / विवरण | अंदाजे रुपये लाखामध्ये |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| अ | **आवर्तीत रक्कम**<br>मार्तृवृक्ष बागेसाठी खते, सिमेंटचा ओटा उभारणे गाळाची माती, शेणखत पॉलीथीन पिशव्या इंधन खर्च कीटक नाशके / बुरशी नाशके, शास्त्रज्ञांच्या भेटी, पाहुणे शास्त्रज्ञांच्या रोप वाटीकेला भेट इत्यादी. सिमेंट ओटा २० X ३० मीटर | ९.०५ |
| | **एकूण (अ)** | **९.०५** |
| ब | **बांधकाम खर्च**<br>१. रोपवाटिका मध्ये नेट हाऊस / हरित गृह / पॉलीहाउस उभारणी करणे. पॉलीहाऊस **१००० स्के.मीटर** @ (रुपये १४६५ प्रती चौरस मीटर) | १४.६५ |
| | २. पॉलीहाउस / कीड व प्रतिबंधक नेट हाउस रोपांची अंतिम विक्री करण्यासाठी (२००० चौरस मीटर दर ७१० रु. प्रती चौरस मीटर) | १४.२० |
| | ३. शेड नेट खरेदीसाठी | ८.०० |
| | ४. ठिबक सिंचन संच व पाईप लाइन **२ हेक्टर** | २.०० |
| | **एकूण (ब)** | **३९.८५** |
| क | **यंत्र व अवजारे**<br>i) ट्रॅक्टर जोड अवजारासहित | ८.८० |
| | ii) रोप वाटीकेला जागणारे दैनंदिन अवजारे | १.०० |
| | iii) रोप वाटीकेला HTP फवारणी पंप व इतर साहित्य | ०.८० |
| | iv) ब्रशकटर रोप वाटिकेतील तण नियंत्रणासाठी | ०.५० |
| | **एकूण (क)** | **११.१०** |
| | **एकूण - अ+ब+क = (अक्षरी रुपये साठ लाख फक्त)** | **६०.००** |

------